**मौजे पळसवाडा, ता. वरूड जि. अमरावती येथील नवीन गावठाणासाठी संपादित जमीनीचा भूसंपादन अधिनियम, १८९४ च्या कलम १८ नुसार वाढीव मोबदला अदा करण्यास्तव निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र. पुनर्व-२०२४/प्र.क्र. १७/र-१२**
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक - २९ एप्रिल, २०२४

वाचा -

१) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र. अ.क.वा./न्यायप्रकरण/१०९९/प्र.क्र.१५२/अ-२, दि. २४/१२/२००३
२) महसूल व वन विभाग शासन परिपत्रक क्र.:-बीयुडी-२०१८/प्र.क्र.६७/ब-१, दि. ९/३/२०१८
३) जिल्हाधिकारी, अमरावती यांचे यांचे पत्र क्र. COLAMR-30016 (15)/12/2024-AMR-RESETT, दि. 09.02.2024
४) जिल्हाधिकारी, अमरावती यांचे यांचे पत्र क्र. पूर-पुनर्व/अका/कावि ३१९/२०२४, दि. ०४.०४.२०२४

**प्रस्तावना :-**

मौजे पळसवाडा, ता. वरूड जि. अमरावती येथील नवीन पुनर्वसन गावठाणासाठी जमिनी संपादित करताना भूसंपादन अधिकाऱ्यांकडून मोबदला देण्याबाबत अंतिम निवाडे पारित करण्यात आले होते. सदर निवाड्यानुसार संबंधित भूधारकांना जमिनीचा मोबदला मान्य नसल्याने, त्यांनी भूसंपादन अधिनियम, १८९४ च्या कलम १८ नुसार वाढीव मोबदला मिळण्याबाबत मा. दिवाणी न्यायालयामध्ये शासनाविरुद्ध प्रकरणे दाखल केली असता मा. दिवाणी न्यायालयाने भूधारकांना वाढीव मोबदला देण्याचे निर्णय दिले आहेत. त्यानुसार संपादित जमिनीचा वाढीव मोबदला अदा करण्याबाबत जिल्हाधिकारी, अमरावती यांच्याकडून संदर्भाधीन क्र. ३ व ४ येथील पत्रांन्वये निधी उपलब्ध करुन देण्याची विनंती करण्यात आली होती. सदर विनंतीच्या अनुषंगाने निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मौजे पळसवाडा, ता. वरूड जि. अमरावती येथील नवीन पुनर्वसन गावठाणासाठी भूधारक सौ पुष्पा जगन्नाथ खुजे यांची जमीन संपादीत करण्यात आली आहे. सदर भूसंपादन प्रकरणी मा. दिवाणी न्यायालय (वरीष्ठ स्तर), अमरावती यांनी दिलेल्या न्याय निर्णयानूसार संपादित जमिनीचा वाढीव मोबदला व व्याजासह येणारी रक्कम अदा करण्याकरिता जिल्हाधिकारी, अमरावती यांनी मागणी केलेली रक्कम रूपये १,५५,६४,५६३/- (रूपये एक कोटी पंचावन्न लक्ष चौसष्ट हजार पाचशे त्रेसष्ट फक्त) एवढा निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

(रक्कम रूपयात)

| अ.क्र. | एलएआर क्र. | नांव | निधी मागणी |
|---|---|---|---|
| १ | क्र. ७३/२०११ | सौ. पुष्पा जगन्नाथ खुजे व इतर<br>रा. लोणी ता. वरूड जि. अमरावती<br>(सध्या वास्तव्य- नागपूर ता. जि. नागपूर ) | ₹ १,५५,६४,५६३/- |
| | | **एकूण -** | **₹ १,५५,६४,५६३/-** |

२. सदर बाबीवरील खर्च भागविण्यासाठी विभागीय आयुक्त, अमरावती यांना रूपये १,५५,६४,५६३/- (रूपये एक कोटी पंचावन्न लक्ष चौसष्ट हजार पाचशे त्रेसष्ट फक्त) इतका निधी BEAMS प्रणालीवर उपलब्ध करून देण्याची कार्यवाही कक्ष अधिकारी (म-११), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी करावी.

३. मौजे पळसवाडा, ता. वरूड जि. अमरावती येथील नवीन पुनर्वसन गावठाणासाठी संपादित जमिनीचा भूसंपादन अधिनियम, १८९४ च्या कलम १८ अन्वये मा. दिवाणी न्यायालयाने दिलेल्या निर्णयानुसार वाढीव मोबदला अदा करण्यासाठी सन २०२४-२०२५ या वित्तीय वर्षात BEAMS प्रणालीवर उपलब्ध तरतूदीतून रूपये १,५५,६४,५६३/- (रूपये एक कोटी पंचावन्न लक्ष चौसष्ट हजार पाचशे त्रेसष्ट फक्त) एवढा निधी “मागणी क्र.सी-६, २२४५ नैसर्गिक आपत्तीच्या निवारणार्थ सहाय्य, ०२-पूर चक्रीवादळे, (९३) इतर (९३) (०३) पुरामुळे बाधीत झालेल्या व्यक्तिंच्या पुनर्वसनाकरिता रस्ते, घरे इ. बांधकामासाठी संपादन केलेल्या/अधिग्रहित केलेल्या जमिनीबद्दल नुकसानभरपाई देणे (अनिवार्य), ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) (२२४५ ०१८२)” या लेखाशीर्षाखाली विभागीय आयुक्त, अमरावती यांना खालील अटींच्या अधीन राहून उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

**वित्तीय शिस्तीच्या अनुषंगाने सर्व संबंधितांनी खालील सूचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी.**

१) विभागीय आयुक्त, अमरावती यांनी भूधारकास अदा करण्यासाठी परिगणना केलेली वाढीव मोबदला रक्कम अंतिम व योग्य असल्याची खातरजमा करुन, उपलब्ध करुन दिलेली उपरोक्त रक्कम भूधारकास तात्काळ अदा करावी.

२) विभागीय आयुक्त, अमरावती यांनी मा. न्यायालयाच्या निर्णयानुसार वाढीव मोबदला मंजूरीचे आदेश तात्काळ निर्गमित करावेत.

३) अदा करण्यासाठी मंजूर केलेल्या बाबी व्यतिरिक्त अन्य बाबींवर अनुदान खर्च होणार नाही यांची विभागीय आयुक्त यांनी दक्षता घ्यावी.

४) या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेला निधीपेक्षा जास्त निधी कोणत्याही परिस्थितीत खर्च होणार नाही याची संबंधितांनी दक्षता घ्यावी.

५) मा. न्यायालयाचा निर्णयानुसार वाढीव मोबदला अदा करण्यास विलंब होणार नाही यांची संबंधितांनी दक्षता घ्यावी. तसेच न्यायालयीन प्रकरण असूनही, मा. न्यायालयाच्या निर्णयानंतर एवढ्या विलंबाने निधी मागणी सादर करण्यास जबाबदार संबंधित अधिकारी/ कर्मचारी यांचेवर जबाबदारी निश्चित करण्यात यावी.

६) सदर आदेशात नमूद लेखाशीर्षांतर्गत कोणताही निधी शिल्लक राहणार नाही अथवा सदर

आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित यंत्रणेच्या कोणत्याही Operational Bank Account/ PLA (स्वीय प्रपंची खाते) मध्ये जमा करून ठेवण्यात येणार नाही, याची संबंधित अधिकारी यांनी दक्षता घ्यावी.

७) सदरच्या आदेशात नमूद लेखाशीर्षांतर्गत संबंधित संनियत्रण अधिकारी यांनी होणाऱ्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवून शासनाच्या प्रचलित लेखा पध्दतीनुसार ते महालेखापाल यांना सादर करावेत. तद्नुषंगाने या लेखाशीर्षाखाली होणाऱ्या खर्चाचा ताळमेळ, विनियोजन लेखे इत्यादि कामे संबंधितांनी प्रचलित पध्दतीप्रमाणे करावीत.

८) या संदर्भातील खर्च विवरणपत्रे/ अहवाल शासनास न चुकता सादर करण्यात यावीत. वरील निधी संबंधित खर्च ताळमेळाची विवरणपत्रे महालेखापाल कार्यालयाच्या Reconcillation Slip सह शासनास न चुकता सादर करावीत.

९) संबंधित अधिकारी यांनी या आदेशान्वये वितरीत निधीचे उपयोजन प्रमाणपत्र Utilisation Certificate महालेखापाल कार्यालय, संबंधित जिल्हाधिकारी/ विभागीय आयुक्त/शासनास तातडीने सादर करावे.

१०) सदर आदेशात नमूद लेखाशीर्षांतर्गत कोणताही निधी शिल्लक राहणार नाही अथवा सदर आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित यंत्रणेच्या कोणत्याही Operational Bank Account/PLA (स्वीय प्रपंजी खाते) मध्ये जमा करुन ठेवण्यात येणार नाही याची संबंधित अधिकारी यांनी दक्षता घ्यावी.

११) सदर आदेशात नमूद लेखाशीर्षांतर्गत संबंधित संनियत्रण अधिकारी यांनी होणाऱ्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवून शासनाच्या प्रचलित लेखा पध्दतीनूसार ते महालेखापाल यांना सादर करावेत. तद्नंतर या लेखाशीर्षाखाली होणाऱ्या खर्चाचा ताळमेळ, विनियोजन लेखे इत्यादी कामे संबंधितांनी प्रचलित पध्दतीप्रमाणे करावे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र. १८६/२०२४/व्यय-९, दि. १९.०४.२०२४ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतिक क्रमांक २०२४०४२९१२४६५५६११९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUNITA MAHESH SATAMKAR

Digitally signed by SUNITA MAHESH SATAMKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=db445cb51227eb5c7d1e60e1dae5c4c6eb3099e8df2b685671ca7ce43d7da12a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F2C72A10C160BE1E389590394A3A444CDBEAECA26E310A25B0FE8565E66CC0DA, cn=SUNITA MAHESH SATAMKAR
Date: 2024.04.29 12:59:15 +05'30'

**( सु. म. सातमकर )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१. विभागीय आयुक्त तथा मुख्य नियंत्रक अधिकारी (पुनर्वसन), अमरावती
२. उप आयुक्त (पुनर्वसन), विभागीय आयुक्त कार्यालय, अमरावती

३. जिल्हाधिकारी, अमरावती
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १/२, मुंबई /नागपूर
५. महालेखापाल (लेखापरीक्षा) -१/२, मुंबई /नागपूर
६. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती
७. महसूल व वन विभाग कार्यासन ब-१/ अ-४/पीएसी/ म-११, मंत्रालय, मुंबई
८. निवड नस्ती र-१२

****